# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक - दुरुस्ती-११२२/प्र.क्र.३७७/पोल-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक - ०३ मार्च, २०२३.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त, बोरिवली (प.) येथील ५० पोलीस सेवा निवासस्थान इमारतींचे दुरुस्ती कामांकरिता प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्रमांक: CP/ACS(H)/D-८(११)/Bldg Br/८५/NR/१/SYA/Gov.१३६/२०२०, दिनांक : २२/१०/२०२०,

**ज्ञापन :-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने, बोरिवली (प.) येथील सेवा निवासस्थान इमारतींचे दुरुस्तीच्या पुढील प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रक रक्कम रु. |
|---|---|---|
| 1 | Renovation And Repairs to 50 Police Constable Quarters, Borivali (W), Mumbai, | Rs.3,29,96,581/- |

२. उक्त अंदाजपत्रक सन २०१९-२० च्या दरसूचीनुसार, उपविभागीय अभियंता, सा.बां. उप विभाग, अंधेरी पश्चिम यांनी स्वतंत्रपणे तयार केलेली असून, त्यावर कार्यकारी अभियंता, सा.बां. उत्तर मुंबई विभाग अंधेरी व अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, मुंबई यांनी साक्षांकित केली आहेत. तसेच **मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी, त्यास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.**

३. शा.नि.क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०/०९/२०१९ व वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच व सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.क्र. १३४ (३) मधील तरतुदीनुसार रुपये १ कोटीपर्यंतच्या किरकोळ नागरी बांधकामांना प्रशासकीय मान्यतेसह निधी उपलब्ध करुन देण्याचे प्राधिकार विभागप्रमुख यांना देण्यात आले आहेत. त्यावरील १५ कोटी पेक्षा कमी अंदाजपत्रकीय रकमेच्या कामांच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रीय स्तरावरील तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिका-याने तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतर, क्षेत्रीय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता (स्थापत्य) व मुख्य अभियंता (विद्युत) यांच्याकडून शिफारशीसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभागाने त्यांच्याकडील कामाची निकड व अनुदानाच्या उपलब्धतेनुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सक्षम असल्याचे नमूद केले आहे. तसेच शासन परीपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, दिनांक २५.०९.२०१९ अन्वये याबाबतच्या सूचना प्रसृत केल्या आहेत.

४. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या बोरीवली येथील पोलीस ठाणे व पोलीस वसाहतीच्या दुरुस्तीच्या कामांकरिता प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध होण्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून वरीलप्रमाणे सादर केल्यानुसार रु.३,२९,९६,५८१/- (रुपये तीन कोटी एकोणतीस लाख शहान्नव हजार पाचशे एक्याऐंशी फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रकीय खर्चास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. यावरील खर्च अंदाजपत्रकापेक्षा अधिक होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२. खर्चाचे अंदाज हे सक्षम प्राधिकारी यांनी स्वाक्षांकित करावेत.

५. उपरोक्त खर्च " मागणी क्र. बी - १. गृह विभाग, मुख्य लेखाशिर्ष २०५५ पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५००९७), २७- गौण बांधकामे " या लेखाशिषांतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन, या विभागास शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार, तसेच शासन परीपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. संकिर्ण-२०१९/ प्र.क्र.१०/अर्थ-३, दिनांक २५ सप्टेबर, २०१९ अन्वये दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०८१५४५२०२०२९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.03.08 15:50:50 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
३. कार्यकारी अभियंता, सा.बां. उत्तर मुंबई विभाग, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड फाईल (पोल-७).